आणुरेणु त्या परीस सूक्ष्म ज्ञानदृष्टी घे पघुन । द्वैत सोडून कर गुरुसे
लीन होई चरणीं लागुन । गुरुकृपेवीण प्राप्ती नाहीं आदी-अंत याचा मागून
गुरुपुत्राला खुनही ठावे निगुन्याला काय सांगून । अनंत ब्रह्मांडे रोम अं
विश्व जीवाचा आहे करता । योगायोगाचे ठाई नटला करनी करू
आकरता ॥ २ ॥ सप्त पाताळीं येकवीस स्वर्गावर त्रिकुटचळीं तो वसला
चार देह, स्थूळ, सूक्ष्म कारन, महाकारन तोरही वासला । अति कारण महु
प्रमाण नळबिंदू तीर्थ पूर्ण दिसला । नळबिंदू चैतन्यरूप संतस्वरूपी
ठसला । कोटी सूर्यांचा प्रकाश दिला अगी त्याच्या प्रकाशाला । चवशून्या
माझा झळकतो प्रकाश त्याचा आहे तसला । अनंत ब्रह्मांडे ज्याचे रोमआं
विश्व जिवाचा आहे करता । युगायुगाचे ठाईं नटला करणी करू
आकरता ॥ ३ ॥ मोरमोरानी एक रूप दोहीचा भाग एक वळखावा । त्याल
पाहून मग न हसावे, भिन्नभिन्न न लेखावा । जन्मा आल्याचे सार्थक आपल
हितार्थ न राखावा । खात सर्व खोटं याचे मागे न लागावा । नाथ बृधाई
धोंडीबा साळी म्हणे मोर सांग आज गुह्य आधी । कोंडीभाऊ, रूपा गर्वा
चटला काल तुझ्या उरावरती ॥

## पद—गुरुभेदाचे

तुझा गुरु तुझपासी । त्यान तुला दावली कासी । मग का भटकतोस वा
घालतोस ढोकासी ॥ ६९० ॥ ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगसी । धरून अभिमान
नाहीं तुला प्रचिती उगाच का हलवितो मान । ज्ञानाची हाटवटी जाणार्व
वरमावरमान । चाव्हटीनी मुक्ती करती पोकळ थैमान । दीड लावणी येईना ।
दोनच बोटं उरलं आसमान । आधळ्याला काय कळले आला गेला दिनमान ।
नाहीं ज्ञानप्रचिती बोलती भरमाभरमान । माये भ्रांतीमंदी पडला । त्याच
काय सानाव प्रमाण । उपजत जें पांगुळ तें कस चढल आकाशीं । जातीचा
मोळक्या कधी भोगी सुकवासी ॥ १ ॥ ज्ञानाच्या कळा काय जातीच्या
गवत्याला । खरं किंवा खोटं पुसा तुम्ही श्रेष्ठ करत्याला । इष्टाचा भक्षक काय
करील मोत्याला । मुक्ताफळाचा चारा हावसेचा शोभे ज्याचे त्याला । पितांबर
लेने कधी ना शोभे भुत्याला । इशारत राहाण्याला टोणपा काय आडगाल्याला ।
केर भरता येईना । सुदा वईरन का घालील जाल्याला । ज्ञानाचें घर खोल ।

हात घर्ले घालीता इरयाला । मनास वाटेल तसे जानव सांगसी लोकासी । खरं किंवा खोटं याची कोणी पाहिना चवकशी ॥ २ ॥

आत्मज्ञानाची हातवटी वेगळीच आहे आत्मखून । गुरुकृपेनें निज वस्तु तुम्ही घ्यावी पारखून । ज्याला वस्तूची प्राप्ती नाही मगन होती देखून । स्वस्वसमाधान वृत्ती राहे स्वरूपाला निरखून । ब्रह्मरूप तो प्राणी राहे स्थीर मन राखून । समसमान सर्व भूती भेदभावना टेखून । मध्यम आंगी गमन करी राहे अमृत चाखून । आउटपीट गोल्हाट ब्रह्मरंध्री नीळ बिंदू खूण । चवशून्याचे माया वस्तु जशी टिक मातीमातीकाची । चैतन्याचा गाभा पुतळी जनु वतली सनकाची ॥ ३ ॥ असी खुन जे जानी ते उत्तम गती पावती । सर्वा भूती समसमान टेखी करी राहे आद्वईत भक्ती । शत्रुमित्र त्याला सारखे ततसमान सक्ती । सगुननिरगुन एक हरि सत्य करी अद्वईत भक्ती। निरगुणयाला कांहीं येइना मार्ग त्याचा बोले युक्ती । धोंडी साळी म्हणे शिका रे काय ज्ञानाला टिकती । कोंडाजी पाहून गुणाला । वैरी कीनावनी मुरती । रूपमनी राम म्हणे ज्ञान काय सांगून मयाळासी । दगडू साळी म्हणे बोकड मुळीच अपेशी ॥ ४ ॥

## पद—भेदीक

ज्यान याचा त्यान पुसावा मनभन झाली सारी । जातो येतो पुसाया उठतो म्हणे मीच आहे भारी ॥ध्रु०॥ थीर बसा कावराज, थोडासा प्रश्न आणा ध्यानी । गवईपण हा नाहीं कामाचा नव्हे पोकळ कथनी । येकीरी रतीचे उद्घ घालणार गान्हार मुकती सभारंगनी । ज्यान उठाव त्यान रतीरंग तो तुनगाव जनी । ( चाल ) तुझा प्रश्न ऐकून जरा बुद प्रश्नावर जुनी । जातो येतो पुसतो कुठ कांहीं हो त्या गाई दावनी । नवते कुठच कोणी असे बोलता मदनी । नवते पवनपाणी वडपत्रीं ही कोणी । नवती छाया माया असें बोलता पुरानी । तेव्हा तुम्ही गान्हार केवढे होता सांगा सभारंगनी । घुमघुमकार बोलता ध्व अक्षरीं माया हेरी । आधी आनाधी वही रेघ वर अक्षर आकार धरी ॥ १ ॥ यान पुसाव कुठून सांगावा बोलतो आम्हाला । पोकाळशुन्य म्हणतो निगुन्यानें अर्थ काटीला । भरेवशुन्य असता रिता कसा ग ययान धरला । आत भगवान गाभ आत झाल माया विंबला । ती स्वहींम दोनी वस्तु होते भरेन मन्यधर ।

तीनच वेल मोहर । मा अक्षर परिमा त्या याला तिच्याच रुपीमुर । येवु नराच्या आगी रगी रगून गेली हर । तुम्ही आम्ही बोलतो देवाची माया आगुचर । तुम्ही म्हणाल इच्छाशक्ती ही आली कडेधर । तिच्याच भेने उडी टाकली बुरखुडे आले वर । जी भगवताची योगमाया तिला नाहीं वर । तिला शक्ती तुम्ही म्हणविता लवाड कवीश्वर । त्या मायेची आदी सागतो झुरे तुझी कानिश्वरा ।

ज्याची त्याला माव ठाव तुम्ही आम्ही लवाड सारी । बोलाया नाहीं ठान असे सभेत बोलता । मौन्य राहाते वशास गाव घ्यावें आता ऐकून । ज्याला एक वस्तू लाधली त्यालाच योगी म्हणतात । इतकी समजुत असता मग का आदमुळ वाढीता । ( चाल ) ज्याला नावाच–नाहीं–त्याच नाव काय घ्यान । ज्याला रुपच नाहीं आरुप कुठसे पहाव । या शब्दाचा घडला मला आणुभन । वाचा नाहीं मग आर्जुनास दावी माय । वाचा नाहीं तिथें शब्द कैचा । द्वेत धरी । मग काय गाता गान मुकाट्याने जा आपल्या घरीं ॥ ३ ॥ यान पुसल कुठून सागान असा जाब केला । सागायासी नाहीं ठिकान येउन पहातो सभेला । येवढ्या सभेमदी मुका राहे नाहीं ठाव बोलायाला । इतकी समजूत असता मग धा उठला गायाला । आता जस बोलान तस चालाव पुरानिक गाडी । माया परमेश्वर तीळप्राय भिन्न भेद नाहीं । तुम्ही आम्ही ल्वाड म्हणूनी निवड करितो कवी । नाथाचा इधाईक धोंडी साळी आनभावी । कटीवद छदभेद वैन्यावर गाई । रूपा मनी राम म्हणे आम्ही शक्तिचे शिपाई । खडू बापू म्हणे शिका रे धरून कोंडाई । शीघ्रात आली शाफ वीर भीडे सभारग्नी बहिरी । फकिराच्या दडप्यान गईरी झाली घाबरी ॥ ४ ॥

## द्रौपदीचा सहा भ्रताराचा

हर हर हर साव सदाशिव शिवपुत्र बोले । पाच पाडव साहावी द्रौपदी सीवच अवतरले । हे मवती रायाची कन्या पारवती पहाता । काय दृष्टी देखिले चळींत्र मातोळीस जाता । ऐक गवतमी पाच वृषभ पाश्रिमेस येता । गदगदगद हासू लागली दक्षाची दुहिता । जीग जीग तुझे जीने तुला का पाच पती वदले । कोन जन्मी पाप फेडसीऽगिरजीसी निवेदीले । तू शिवाची काता भवानी दक्षाची लेक । काय निमित्त पाहून हासली मजकडे

आईक । तुजला असे पांच भोगने मानवलोक । कल्पांतीं हें खोटें होइना, घे वचन माक । सद्‌गत होउन बोले पारवती कसे देवा केले । मी अती अपराधी अन्याई ह्या दोषी पडले ॥ २ ॥ जन्मोजन्मीचा भ्रतार माझा हा चंद्रमौळी । आरुपते रुपासी आले तेंपासून जवळी । आता देवा काय करावे म्हणून तळमळी । पाच भ्रतार आले भोगणें माझ्या कपाळीं । का वेहती जगदंबे आवे म्हणूनी प्रश्न केले । तुझ्यासाठी धरीन अवतार पूर्वीच भोगले ॥ ३ ॥ पारवतीचा दोष शिवानें दूर करायासी । पाच मंत्रचे उजून ठेवले चल्यपापाशी । देव आसवींनी राजा इंद्र वामेवासी करोपरुपींनी तेच मंत्र दिले व्यासासी । तेच मंत्र फिरफिरत व्यासापासी आले । व्यासरुपीने ते मंत्र कुंतीला धीले ॥ आश्वीनीचा नकुळ सहदेव यमाचा धर्म । इंद्राचा होइ अर्जुन वायुचा बलभीम । पारवतीची झाली द्रौपती खरा हाच जन्म । मुळींच सहावा भ्रतार शिव तुम्ही घ्यावा ऐकून । काशीखंड ग्रंथ याचे पहावे दाखले । कवि हायवती म्हणे टग्र तुला शिवाचे पुसले ॥ ५ ॥

## शिवनामाचा प्रश्न

निराकार निराकार म्हणता निराकार काई अरे । पंडिता ज्ञानसागरा ऐक चतुराई । नवती जमीन आसमान पाणी पवनाचा ठिकान नाहीं । ब्रह्माविष्णु शंकर हें रूप कुठे सांगाई । अनाम ज्याला नाम नाहीं कसले बोलाई । आरूप तेथें रूपच नाहीं बोल्तोस काई । कोणच्या गुरूचा शिष्य कोणी मांडीवर घेत नाई । गुराख्या मुला तुला याची वळख नाहीं । अठरा पुराणें कोणकोणती दे याची गाही । ( चाल ) अनाम ज्याला नामच सिवनाम ते कांहीं । अलक्ष वस्तू लक्ष नाहीं शिवनाम ते काई । आरूप आहे रूप नाहीं शिवनाम तें कांहीं । आचळ वस्तु चळत नाहीं शिवनाम ते काई । जिला आहार निद्रा नाहीं, सिवनाम तें काई । काय शिवाचें नाम सांग पाहू तुझी चतुराई । घांतद तिला वळख दाखवा शिव आमचा हाई ।

## पद--भेदीक

भावभक्तीचे मुशान सांगता, नाहीं अंतीं ज्ञान । ज्ञानावाचून व्यर्थ जन्म पशुसमान ॥ ध्र० ॥ भावभक्तीचे मुशान । सांगसी धरून अभिमान । नाहीं ज्ञानप्रचीती उगाच का हटविसी मान । ज्याला नाहीं ज्ञान तें एक मूर्ख

म्हणावें असान । ज्ञानाची व्हावी प्राप्ति म्हणून केलें शास्त्रपुराण । (चाल) भाव म्हणजे ज्ञानापासून । आतीं पाहे कसून । गुरूला ये पुसून । मार्ग नाहीं ठाव । आधळ्याला सूर्य काय दिसेल । ज्ञान जर असल । भाव मग वसल । पावल मग देव । पुंडलिकासी नवते ज्ञान । होता अज्ञान । बायकूच म्हणे काशीला न्याव । कुर कुठ ज्ञानी पुरता । उपदेश हेरा । गेला त्याच्या घरा । वसला मग भाव । पुडलिकासी मग उपदेश केला ऐका कुर कुठाण । झाले जन्माचे सार्थक्य भेटला विठ्ठलनिदान ॥ १ ॥ अति पातकी वाल्हा कोळी म्हणती हो त्याला । सात राजन खडे भरले, मारी ब्राह्मणाला । त्रिलोकाचे गमन असें कळलें नारदाला । (चाल) नारदासी तेव्हा पाहून । आला धावुन । टोनपा घेउन । उभा राहीला । नारद करी भाषण । महा दोपन । बुडल अज्ञान । असा पातकी नाहीं पाहिला । नारद ज्ञान त्यासी करी । जाय तू घरीं । पाप अधिकारी । कोन होईल आशा वाहिला । वाल्मीक घरासी गेला । पुसुनी आला । म्हणे नारदाला । तारा काहीं मला । वाल्मिकासी उपदेश केला ऐका नारदान । वाल्ह्या कोळयाचा वाल्मिकी झाला उलट्या नामान ॥ २ ॥

नामदेवाचा मोठा भाव पहा देवापासी । साक्षात भाषन करी देव त्यासी । पुढें ऐका साधु जमले कोणे एके दिवशीं । आटुकाट भक्त बसले तेव्हां कीर्तनासी । (चाल) गोरा कुंभार त्याचें नाव । म्हणे ज्ञानदेव । कच्चेपक्के पहाव । वसलें सारे । गोरुबा ठोकींत मारी । पाहिली सारी । आली मग बारी । नामदेवावर । गोरुबा तेव्हा बोलला । गुरु नाहीं याला । नामदेवाला । कच्चा हा फार । नामदेव खजील झाला । देवाप गेला । पश्चात्ताप केला । वसला मोहर ॥ नामदेवासी देव म्हणे जा खेचरीसी शरण । तो सागेल ज्ञान तुजला । तुजें चुकवील जन्ममरण । ३ ॥ भावभक्तीच्या गोष्टी सागता घेता तीनदा नाव । पचवटीमदीं जपीं तपीं धरून बसलें भाव । आल गगेला पाणी, मग का त्यानी वाहून जाव । त्याच्यासाठीं कुठ आला सागा तिथें देव । एकनिष्ट धरून त्यान आरजीवला देव । (चाल) भाव म्हणजे तुझा वरदाळ पोटात कळ । गळ्यामंदीं माळ । राहाती मैदाला । ज्ञान म्हणजे तुला काय ठाव । राजनीत राहाव । गुरु मानभाव । वश्याला केला । ज्ञान माहित नाहीं तुम्हाला । पुसता आम्हाला । सागतों तुला । होई आज चेला ।

थोंडी साळी म्हणे माहित नाहीं तुला ज्ञानाची खुण। बाळा लक्ष्मणा म्हणे पाहे शास्त्र शोधून ॥ ४ ॥

## पद–निशाणाची झडती

आदशक्ती स्वारी झडती किता पुरानाची। लावून डफावर वीर झडती देतो निशाणाची। ५८०॥ निराकार निरगुन आविनास उत्तम पुरुष तो जान। पाच तत्व त्याचे स्वर्गी पच रगाचें निशान। चैतन्याचा पिवळा वाना भडके निशान। निळा रग निशान प्रेम विष्णूचे गावन। भगवा बाना विष्णु बहिरवशा भगवान। क्षीरसागरी महाविष्णुचें हिरवें निशान। सफेत टवळा बाणा विष्णु वैकुंठी निधान। चौऱ्याशी बुटाची निशान तोच तुरा नर्वीन। आरक्त निशान त्या इंद्राचे द्वादश तो चतुरानईन। छत्तीस क्षमनी तेरा कोटी पिवळी निशान। सावध होई शाहीरा, निशान झाली आठरा पुराणाची। पुढें राहिली ती सागता दाही अवताराची।१॥ मच्छ अवतार विश्वभर विष्णु मच्छ अवतार। वन्हाव तो शकर क्षयनी नरसिंह अवतार। वैकुंठी विष्णु वामन सदाशिव तो फरशधर। विष्णु वाहिरवतो रघुपति कृष्ण करतार। बौद्ध अवतार तो ब्रह्म ऐका कल्की अवतार। उत्तम पुरुष प्रेम विष्णूचे तिन्ही अवुर। तीन्ही एक सभेस झाली तोच कल्की अवतार। एकुनीस निशाण सागितली याचा तर्क धर। तेच निशाण चौथे वगामदी दाही अवतार। चद्रसूर्याचे लाल निशाण। याचा शोध धर। काळी निळी सफेत निशान चोवीस मेघाची। पहा गणती पुराणात झडती साटकोटींची ॥ २ ॥ हिरवें निशान वायलचे नागवद सोमनशी। तीस हजार निशान कौरवाची। सहा हजार निशान दलामदी पाची पाटवाची। कौरवात आली नशा नाशा हा नवकुळीची। सफेत, लाल, पिवळें, बाडें, काळ्या रगाची। देवदानवाची झाली आता राहिली मानवाची। राजपेशवे ऐका त्याला पदवी शुभाची। घे समजून तू सोड कल्पना अवघी मनाची। शिंदे होळकर घोरपड निंबाळकर मानकरी त्याची त्याची निशाण। पाहिली पुराणात सागितली साची। देवदानवात निशान धर्मभूमीची। चवऱ्याशी क्रोड आली गणतील बेरीज अवघ्याची ॥ ३ ॥ अभग अवर पाया पक्का गुरुनाथ सवाई। खडु हयनतींसां वेहत पळे मान मावी। एवयाशीं करोड सव्वा लक्ष निशान अवघीं ऐकावी। नेरे नेरे रग धिरे तुला सागून कवि। आदशक्तिचें देणें बक्षीस ऐकुन घे भाई। जरी-

दोन्ही वाद्या जडनी वाहोटीला । मुसु मनामदींच खादोटिला । चित्रगुप्त हे बसले, हे सगुनकी वा अवगुन ॥ ३ ॥ चोळी चांगली परंतु याची होईल नकल । चोळी ही गुरुवचनाने टिकल । जाईल गुरुला शरन फेरा चौऱ्यासी चुकल । नाहीं तर व्यर्थ स्वहिता मुकल । दास हारिचा तात्या म्हणे जा शरन संतालागुन ॥ ५ ॥

## लावणी

आला ढवळा सांग च्यातुरा उतार दे या पदाचा । पाहु तुझे कईमत यावाना पडला प्रसंग आज वादाचा । लहान थोर तुम्ही आवघे बसला गलबल मना जरा करावी पुसपुसतो ढवळ्याची कई लायाची धुरत तुम्ही धराई । शांख आंधारी ढवळा सांगावा पाहु कईची चतुराई । ज्ञान मोठे सिधांत पाहूनी पृछा पदरी धरारी । आसल कोनामदी उरमी सांगा यागा धरुन जरा थिराई । नाहीं वलवल कामाची । सभेमदी नको रिकामी पुगराई । चाल । नाहीं रुप ना रेखा या हाता ढवळा सोहं आकार । पाहु जाता रूपरेखाई वासन सवागुन रूप वकार । कोने ठिकानी राहाता, ठेवला कसा आहे त्याचा प्रकार । स्त्रीपुरुष उभयता ढवळी एक दोघाचा आकार । मायेच्या सुनदुरता ढेवळा नहो स्वरुप निरविकार । त्या टवळ्याला धरुन चालतील तरतील प्रानी तदाकार । ढवळा लाधला ज्याला त्याला जन हे करत नमस्कार । असी सृष्ट पदी ढवळ्याची, त्याचा कोने ठाई आहे वस्कार । मानीक ब्राह्मण हा ढवळा खातो पापड उडदाचा । नकारिका म्या छपा गपा धावा जाव या शब्दाचा ॥ १ ॥ अंसोहं चईतं नीजरुप जरी हें ढवळ म्हनजील । निरगुण निरविकार निरंजन ढवळा म्हणता फसील । चार खानीच्या खानी चार, देह यांत कांहीं नाहीं हासील । हा उडोळा हा मदन ढवळा म्हणता गोत खासील । संबुड, खाकरा केंस ढवळे मेंदू मादेन हो घरसील । आष्टपाकुळका दसनाद ब्रह्माडी प्रकास आसंख्या घेसील । चाल । मंत्र, तंत्र, यंत्र आस्त्र धनुष्यबान वहो कई राया । चंद्रसूर्य नवलक्ष तारांगण गगनी लागली फिराया । जीवसीव आत्मा म्हणसील ढवळा मित्य गोष्ट दूर कराया । न हो ढवळे आनंदा न आवतार धरले भुमीभार उतराया । गीता भागवत येंदशाचा पुरान केली जग ताराया । आला ढवळ्याचा भिरका तुम्हावर तुमचा गर्व जहराया । ढवळा आयकून धासत बसला नकाल गुभुइ उकराया । आधीमधीचा ढवळा नाहीं त्याला आधार आहे येदाचा ।

ब्राह्मण वर्ण गाईची मंत्र न हो ढवळाची पदाचा ॥ २ ॥ ढवळी गोरी आक्षर कागद हा नाही आम्हीं घेनार । सत्य समुद्र आदिरावनी मेघमंदल नाहीं जमनार । एकवीस स्वर्ग सप्तपाताळ सेसशाही नाही पटनार । हिराच ईरागर मनीं कस्तुभ परयस धातु करनार । संक शिंपला मोती स्पटीक दगडखानीमदीं निघनार । भुसेन शेंभुचे भस्मदवूर त्रीसुळ नंदीवर बसणार । चाल । स्वपदपक्षे सर्पवृक्ष पुष्पहार तो कंठिचा । दुग्ध दधी घृत लोनी तया हा तो व्यापार राहाटीचा । म्हणसी ढवळा रुपाया कापुस डसतो साकर गाठीचा । मछ बगळा राजहंस कापुर, सोरा पारा चुना भटीचा । गोपीचंदन सावन सीव अमृत का आनिक काटाकाटीचा । पाण्यावरील तरंग बुडबुडा तांदुळ जोंधळा आघुटीचा । या आकार प्रपंचात नाहीं ढवळा आहे येगळा आटीचा । नाहीं नास ढवळ्याला पाहाता उतार दे आज झटपटीचा । आकार अवघा नासीवंत ढवळा आहे आक्षिवंत आनंदाचा । आई नास परब्रह्म पिता सदा निमग्न निज छंदाचा ॥ ३ ॥ तुरे करा हो तुम्ही ढवळ्याची पुस सांगा । ईलचकर । खरे पनान उतार धावा कशाला हाई कर कर । तुम्हाभवती आज ढवळ्याच फार मोठ आल चकर । कोण्या युक्तीने उतार घाल संभाळ ढवळ्याची ढकर । नाहीं ढवळ्याची खुबी समजनार । आर्थ ह्याला आज जिकीर । नका कुजबुजू येकु नरामदी पाहे नदर जरा वरकर । चाल । भावभक्तीनें हा ढवळा हें भक्तीचे भुशान । शब्द रुबीच मंत्र बुपदेसी तो टवळा म्हणावा कशान । ज्याला ढवळा माहित नाहीं प्रतक्ष नर तो पाषाण । ह्या ढवळ्याला खोटं म्हणाल तर ब्रह्म हा त्याचें दुशान । ज्याला ढवळा लाधला त्यासी ईश्वर करतो भापेन । नायंत्रधाईक घोंडी साळी म्हणे टवळा सागाव गुरुचित्तान ॥ कई कोंडाजी म्हणे खोटं बोल्ता फजीत व्हाल अज्ञान । रुपा मनी राम म्हणे सांगितल्यावीन नको लाऊ मिदनिशान । शिर्रात आळीशाप्याकीर म्हणे नका बुकी वादाचा । खरेपनान उतार घाल नका गोंधळ आज मैदाचा ॥ ४ ॥

( साकी )

वीरान एकई अर्याचा अनर्थ करून बोल ॥ शेनर महादोसी म्हणती आनाधी सीधी सुद धावी मजमती वारंवार प्रार्थना श्रीपती । घोंडी साळी बालक सेवक तुझ्या चरणीं लागो गती । जई जयाजीनी-जमुरती ॥

## श्री लावणी

जयजयाजी प्रभो आचळास्तुती करून नमीला । संकष्टी रक्षार्ने पावनीखानी दासाला । आदि आदपुरुषा सर्व आदिशा नमितो तुजला । सर्वा आगुचरा इश्वाबरा एक एक वुजला । सृष्टी न्हाई धखी असा हेत धरला । आदमाईचा जलम तीचा तुजपासून झाला । जय निरंजना निर्विकल्प जलम आंती उद्भवला । चाल । सर्वोबीजा आतीरूप तेजावट पर्ती भगवान । इछा कल्पना झाली चेतना तीज तो झाला चैतन्य । ईछा सरसी ऐसी आदमाया करी उत्पन्न । आदमाया आदि ब्रह्मांड गोळ रची रचना जाण । कसी पुढं झाली रचना कळना तुम्ही आईका गावन । सृष्टी मांडन तुम्ही गिनलेना आईका-उकाला । पृथ्वीपासून लक्ष येवना सूर्य उंच धरला ॥ १ ॥

पृथ्वीपासून लक्ष यवजन सूर्य उंच धरला । सूर्यापासून उंच चंद्र लक्ष यवजनाला । चंद्रापासून लक्ष यवजन तारांगना गणतीला । नक्षत्रापुन लक्ष यवजना मंगळ वस्तीला । मंगळावर बुध राहातो ऐका उकाला । पुधावता गुरुचा रहिवास का ब्रह्म धरला । चाल । गुरुवता सुक्राचा मग आहे तो रहिवास । सुक्रावर मग त्या शनीचराच आसन आस । एकमेकांचा आंतर लक्षलक्ष यवजनास । सनीपासून राहू आईका । लक्ष यवजनास । राहुपासून केतू आईका लक्षनास । केतुपासून सुनमंडळ लक्ष यवजनास । सुन्य मंडाळावर मार्कंड रुशीवर आसन घाढून वसला । मार्कंडीवर रोम हा वसना त्यावर ताल धरला ॥ २ ॥ रोम हा वसनावर तो आता येद हा वसमिन । तेथुन पुढे वर वघ दालक्षे रुसीची आसन । सत्यंरुपीची आसन एक एकापून आंत्रान । घोटक्यात आटपतो वर आंदीपुर याची आसन । सप्तपातळी चरना वरता मुगुट संगीन । मुगुट पहाया वर ब्रह्मा गेला झाला गर्व हरण । चाल । दसदेसामधें भागे सूर्याचा रहीवास । चंद्र राहातो ठिकाना त्याचा आहे तो पुरयेस । मंगळ राहातो ठिकान त्याचा आहे दक्षन देशास । बुध उत्तरेस गुरु आईका तो राव पछमेस । नईरित्य कोनी सुक्र राहातो, आईका कविराज सासनीचा रहिवास । आहे त्या आगर्नकोनास । राहु राहातो ठिकान त्याचा युदेशाला । ब्रह्मदेवाचा श्राप निजड जातो दृष्टीला ॥ ३ ॥ आरध्या पळांत किती आवतार झाले तीवाजनाचे जान । नाथ निरंजेन म्हणे दाखले तुजला

सागन । ब्रह्मदेवाची एक आर्व आयताराची जाईन । दहालक्ष विष्णूचे हे अवतार सगीन । सहस्र अवतार झाले म्हैराचे घ्या समजून मनी । आख्या पळात आपली वर्ष कितीक सागन । चाल । तीस क्रोड चार आर्व ब्रह्मयाच्या दिवसाची धर । ईसानिधी त्रेताल आर्व विष्णूच घटकी सार । वीस खर्व चार पद्म गेली म्हैशाच्या पळात घेर । किती सत्कीच्या आख्या पळात आईकून घे शाहिर । वीसनी वेताळ सक घे वरस बराबर । नाथ गुरुमहाराज धोंडी साळी उतार देतो चट सार । रुपा मनी राम म्हणे नवग्रहाचा केला उकला । सीग्रात आली शाककीर म्हणे तुझा उतार झाला ॥ ४ ॥

## दत्तात्रयकवन

श्रीदत्तात्री महाराज पुसे गुरला सागा साधन जुग । कोने वाटे कसे जावा आत्मा भेटल कोन्या मार्गे ॥ ध्रु० ॥ श्रीदत्त पुसे गुरुला साधवक्रण कळा सागा मजला हो वचा सागा मजला । आत्माराम नीज नर्मि साधन । सुक सागा उकल । आता नाथ सागते झाले साधन सुख श्रीदत्ताला । प्रथम साधीजे रे जन्म दुसरा पूर्वक हा धरला । ककू भकहा आनखी साधावा पहाती सन्याला । चवथा ताहाटक जेष्ठ प्रथम जावे हाधाराला ।

( चाल )

ज्ञानशक्ती गनपतीचे दर्शन घेऊन पुढे चला । तेथून पुढें स्वदिष्ट ब्रह्मा सावीत्र जायाला । सहा सहस्र जप साडून पुढे जाईन नपुराला । लक्ष्मी सईत मुहारी मन पुरचक्राला । सहा सहस्र जप साडुन पुढे जाई आष्ट दळाला । आष्ट फळर नी पाही डोळा ज्ञानदृष्टी मन उकला । कोने पावुळकी आत्मा वसे काही गुन तीथ उद्भवला । श्रीदत्त पुसे गुरुला प्रश्न सागा । मजला सागा । पाकूळ खाडकला फरुन सागा मजला वग । पूर्वे दळिची पाकुळ काधेतर्ण घर ध्यान । धईर्य दावे पुन्यासना पूर्वे दळी वसून । आग्र आष्ट दळिची पाकुळ फार रक्त रगतीचा वर्ण । तेथें मन थिरवता आळस उद्योग होय उत्पन्न । दक्षवदळी आयका कृष्ण वर्ने वाळा जाव । ( चाल ) क्रोधा दोस्ता वेगळा दक्षिय दळी मळ येऊन । नैरुत्य कोवी पाकुळ का रग तिचा निळ्वर्ण । तेथें मव मयूर करा वेळता । माया पडे मोहन । पार्श्व मदळ व पित्र वर्ण मन सचार थिरावून किरडा विनोद सुक वाटे श्रिम

दळी म...... । काय वक्रोविची पाकुळ रंगती । शाम वर्ण गावा ॥ ह्या दळी मन थिर राहे वाटात तीथे यावे करून । आसे वाटते करावी कथा घ्यावा साधुदर्शन । उत्तर दाळिची पाकूळ खा कापिल वर्ण आहे रंग। आष्ट योग्य सुखी रमने करू उपजेला बहुसंग ॥ २ ॥ इशान्य पाकुळ का गौरवर्ण हाय का करार । तेथें मन चिरावता उत्तम पुण्य धर्म कर । शांति उपजे प्रेम सुमवासी ईशान दळीवर । मधी थिरवता निद्रा सप्रावीयक घंटाधर । तेथे मणकरी आणू संधान आष्ट दळी कंवळी ज्ञान खर । तेथून पुढें आणू हात आय जेय तेथें सहस्र पारवती शंकर जाग्यावर गरजे हारहार । पुढे ईश्वधीची उडी आयका शक्ती मोहापर । साडून तिजला ल्वकर जा येद्री दळावर । विप्र टार इथिडई दक्षि पिंगळा तिन्ही वग धर । त्रीवेनी

तेथें अमृत संजिवनी दत्तात्रया त्रिकुट सिखर । तिन्ही वायकड्यावर फारव्या पाहे खंकार । मारुती. वेगे पिंड जिंकावा या नेमानें धर । सतरविच्या समाधाने आमरकाया पूर्न राहे थीर । पिंड झाला तेथून पुढें मग ब्रह्मांडीचा वग । ब्रह्मांडी शङ्खचक्र साधावा पुढें आयका लाग ॥ ३ ॥ आता यासी कसे सान्निध करावा कोन्हे मार्गपरी । गुरुराया गुहे गुप्त सांगतो चित्ती तर्क धरी। तोरे सहस्र वदळी जाय सहस्र मळी रिखावकरी । ओटपिटाचा मार्ग पवन वेगं जालवकरी तेथून पुढें गेला मुद्रपवणस यशी करी । चाल । वृद्धपथे मगरी गांव आयका सादपुरनगरी । योग्य पुरनार मिरगे झाला पुन्य योग्य सरी। श्रम रगुफा भ्रमर जाळे मन पवन मेळ धरी । रिधीसिधी युक्ती वळे ह्या मग जीवी धरी । भ्रमर गुफा प्रसाद लिंग सदाशिव भक्त हेरी । दर्सन घ्यावा आनंत तयाचे आसे आदण छुतरी । तेथें प्रकाश प्रकाश परजोती स्वहं ओळखच धरी । कोटीचंद्राचे ते प्रकाश जवर शितळ सुकलहरी । तेच गुरु-मुखी खुण ओळखावी का झालीस ········नाथाचा ब्रधाविक धोंडी साळी चरणी ठाव माग्र रुपामनी राम सिस्या हाव्याला फड प्रसंगीं रंग ॥ ४ ॥

## पद—स्त्रियांचे मदनाचे

कोण्या ठिकाणीं मदन स्त्रियांचा सांगतो तुजला । आईकून घे शाहिरा तीर्थीपासुनी काला ॥ ध्रु० ॥ सुद्धे प्रतिपदेपासून चढतो आंगी मदन । डावे आंगी उतरतो सुद्धप्रतिपदेपासून सुद्धप्रति पाडव्याच्या रोजी उजवे आंगुष्ठी

जान । विजेला पायाच्या तळास कावि ध्या आईकून । तृतीया व चतुर्थीस पायावर धर ध्यान । पंचमी सष्टीस जांघाडामदी परिमान । सप्तमीस यवनी-मुखी आसन मदनाळा ॥ १ ॥ आष्टमीस नाभीस्तानी राहातो मदन । नवमीच्या दिवशी थानामदीं शास्त्रपरिमान । दसमीला कंठी राहातो डोलवितो मान । येकदसी होटावर स्त्री खाई पिकलें पान । द्वादसीला नेत्र चाळे करी कावि ध्या तुम्ही आईकून । तेरसीला पापनी नेत्री चाळे करी जान । कठी आम्या[ं] घालितो मदन चतुरदसीला । पुनवचे दिवसी मस्तकी ठिकान मदनाला । हे नकानकाचे कई सांगितले तुजला । आतां येथें लवकर सांग सभेला । तुरता उतुर दे शाहिर कामवने बसला । सोला वर्षे काम चेततो नारिला । आठ्ठेचाळीस वर्षे मदन समतोल राहिला ॥ ३ ॥ वृद्ध काळीं मदन छावितो कोने टिकानी । बाळपनीची खुन पुसतो सांगा गुरू ग्यानी । शब्द गुरू गनपतराव म्हणती नव्हे पोकाळ कहानी । बाळ भिमाची जोड हरदासे जळे ती मनी । हरि देवबा शिलकरी बोलती तुरेवाल्याला । काय देईल उत्तर बोडकीचा फड प्रसंगाला ॥

## पद-ढोलकं तुनतुन्याचं

नमस्कार निरगुन निरंजन होता भगवान । त्याला झाली इछा पुनरचले त्रिगुन । केला आकार तीधा निरचाले मदन । तेव्हा पुना विराट रूप नटला भगवान । चाल । विराट रुपाच्या भेद खुणा मी तुम्हाला सांगन । येथून पुटे विरतार आयका तुमच्या पदाचा । लावून डफावर ब्रीद गाणार आला शक्तीचा ॥ १ ॥ ब्रह्मांडाच वाड सव्वा हात फेर केला । मढिवल कातड्यान उठल खूप आवाजाला । करून रक्ताची खळ कातडं लावील कड्याला । श्रवणाच्या दोन झाजऱ्या उटल्या आवाजाला । पिंड आहे पाकाळ मापट केल संगीन । वरून रक्ताची खळ कातड लावल वरून । मधी मेरुची दाडी मनी पाठीसी पहावी खून । लिंगाची केली खुंटी आवाज उठला तुनतुन्याचा । शिराची लावून तार दरत सेटाचा केली । नाभी स्तनाची जीगरी काढून मापल्यास लावली । विवेकाची काडी दोरी मायाची लाविली । डफ झांजा तुनतुने तीहिची खूप सांग जमली । धुंद धुंद कार आवाज उटला कड्याचा । घुम घुमकार झांजहि गेली सुराला । ३५४ टाक वजन ऐक

कवी मुला । टाकून सुरावर काडी कोन कोन शब्द सुराचा । डफ झांजातून ती हीच भावाच नात । जो वळखील या शब्दला तो गुरु जान । सद्गुरु गोप ळराव हात स्तरावर देत गवु करितो कवन । आखाडा मगतगल्लीत । मनु साहादू सुर धरून बोले हरदासाला गोविंदाला पाहून मान भाव पळाला । घे उत्तर आईकून ईरा काला जुनवला । डफावर बावन ब्रिद वाणा कर मगाचा ॥

## पद अनामाचे

तुम्ही येवकी पुरुष सत् लक्षणी पंडित महाज्ञानी । शास्त्रार्थ फोडून कादावा याचा वेचूनी । आठरा पुराण ग्रंथाचा अनुभव वसला घेऊनी । झाली तुम्हासी गुरुकृपा दावा वाटे लावूनी । चाल । न्हवता जळी जामार । होता अधी अंधकार । तेथे नाही शब्द ओंकार । अवघा भिनाभिन्न वेदाने कवी फार । बोलता शास्त्रपुराण । पिंड भासतो मिठा झिना तो भिन्न भिन्न । भिन्नी भिन्नी शास्त्र भेद फोडून ॥ १ ॥ सर्व नासवित अविनाश भासत कळेना । सर्व एक हे गुनास निरगुन ओळखच गवसेना । सर्व्या लक्षामधी अलक्ष्य लक्षांत वासगाना । जिकडे पहावा तिकडे रूप अरूपच दिसेना । चाल । दरडे सन्य बनून एक्या अग्नी मन टेवून । उमजुन मुद्रा लावून । त्याच्या पलिकडे खून । खुन तुम्ही पहावी दष्टीन । दावा तुम्ही बोट लावून । मिथ्या गोंधळ गईबी आवाज चावली वर कथनी । उरली जिनसही पुठे गवसे ना गईबी अकसावानी ॥ २ ॥ मला भासते सर्व नाम अनाम ते काई । जिकटे तिकडे समसमान प्रकाश नामच भरल्याई । नाम असता अनाम करता वया जुलूम काई । दहा दतनाम दिसत असता कसे आळखे होताई । आवमव गंग नाम गोलट मंडळी । कविनाम इंद्रपुरी कई नाम । जेथे पहावे तेथे आहे नाम । रोमरोमी भरी नाम । सत समागम । दमून अर्थ करावा ज्ञानी । हे नाम स्वतोहून अनाम गाई लागल चरणी ॥ उरली जिन्नस शिवशक्ती वऱ्या पुसल्या उक्ती । भेद नाही अभिद तेथ कईची शिवशक्ती । निरगुण निरविकार निरंजन अलिप्तच होती । अरुप होती रुपास आणली रुपतच शक्ती । चाल । प्रश्न पुसतो मी अज्ञान । निराकार निरगुन । गुरुशिष्य येकच का हो न अज्ञान भिवचा अर्जून । वर्म या तुम्ही सांगून । अदनाम

गाऱ्ह्यावर म्हणाव जाण । शक्ती हारदासावर दिली सोडून । भिमाकाठी गाव चिंचोटी काळ्याच ठाण । गातो कान्हु मऱ्हाटी तेव्हा तो शास्त्र दोडून । शास्त्र सोडून हो अक्षराला अक्षर जोडून । जोडून काळ भडकनी कमन ॥ ४ ॥

## झगडा

नका जाऊ तुम्ही गुणी राया । माझ्या ज्वानिचा भर जातो वाया । तुम्ही जाताल दुसऱ्या देसी । तुमच्या माग मी घेईल फासी । नार वाजिंदी झाली ग फार । सागतो मी तुला वारवार । तुझ्या मनात आहे ग अढी । तुला मोडून देतो काडी । तुम्ही लागाल हो राटच्या पाठी । तुमच्या हातात देईल ती नरोटी । राडेची आहे ग मला शीक । तिच्यासाठीं मी मागन भीक । तुला उटळ गर्मिचे रेंद । त्याच्या आहे मजपासी अवशद । काय सागु तुम्हाला ग वहिनी । दादा लागले गाडूच्या ध्यानी । नित जात्यात गमेवरती । आग मखमलचे सदरे हो शिप्रती । अहो काय सागु तुम्हाला ग वहिनी । दादा लागले गाडूच्या पाठी । ह्या ग भडव्यान कळ लाविली । अहो याला काय । आमच्या दोघींत याने पाडली तूट । गाडू का झाला बे काम । हा रे सेपटच्या रामराम । करते मी आरजी । नाहीं माझी मरजी सपत करयाला गा खावा । तुझी सेपत टिकुन्याला ठाव । देते मी हो तोडा । आन्हीन तुला जोडा । सेपथ कशाला ग खाना । तुम्ही सेपथ ठीक आधी खाल मोंडू भोंदु । निरपोच्या साल्या गाडु । आधी तुझी ।

आदीनाथ चरण स्मराचित्ता । नसे मग भवभयाची वार्ता । दुःख दारिद्र्याची चिंता नसे समुळ । आदिनाथ प्रणव बीज ओंकार प्रपचाचे मूळ ॥ ध्रु० ॥

आदिनाथ तो ओंकार । तेथूनी वेद झाले चार । साही शास्त्राचा विस्तार आठरा जाती । तिथून कर्म धर्म स्थापिले वाटिल्या याती । सत्य नावें सत्य स्थापिलें । निघाली सत्य फळासी आले । प्राणी मोक्षपदासी गेले । म्हटली प्रवृत्ती । सत्संगे करूनी तरले जडमूढ मती । त्यानी शिकविले शिष्यास वादविली कीर्ति । अचळपरी अचना नाथ, अचळपदीं भक्त स्थापित होईना चळ गेल्या कल्पात पद अचळ ॥

पंढरीनाथ पंढरीसी । जव आगळें तीर्थ कासी । साधु जाती दर्शनासी यात्रा भरती । वेदनाद गोपाळकाला तीर्थ करिती । जगन्नाथ जगाचा धनी यात्रा होती । चहुकडूनी एकच ठाई बसती भोजनी दोष हारती । जे करिती तयांची निंदा कष्टी ते होती । कैलासनाथ शिवशंकर । त्याचा नकळे अंतपार । पारवती नाथ उमावर । पशुपती ब्रह्माड गोल खेळवी, सुत्र धरी हाती वैकुंठनाथ लक्ष्मीवर । अनंत ब्रह्माडे रमावर । मायाचाळक तो विश्वपती ॥ अंबरनाथ वज्रपाणी, सर्व देवांचा तो धनी । कार्य साधी युक्ति करूनी रक्षी दिक्पाल ॥

दत्तनाथ दिगंबर । हरिहराचा अवतार ऐसे । वदती वेद चार । रक्षी भक्तास कामधेनु चारी वेद राहाती सेवेसी । नाथ आदि झाला । नाथ श्रेष्ठ आहे सर्वाला । दाही दिशा दिपूनी बसला । आजूबाजूसी । तुझे आदिस्थान आहे आज सभेसी । जपीतपी सिद्ध योगी । जंगमजधी आणि वैरागी । द्रवेस कापडी अघोर लिंगी । पंथ संन्यासी । हे झाले नाथापासून बावाजी वस्ताद आहे रणशूर । कलगी निशाण डफावर । बाफलिंग्रा छंद गानार बसले सभेसी । शामराव बोंडे मान जावा आता भावगाशी । कविराज गणपती गावण दत्तनाथ प्रसन्न पूर्ण ॥

## लावणी

सर्वात शिष्ट हे गुरु जगत्पती अवघ्याची माती । आधीरूप अलक्ष चराचरा पचभूत जनीता । तेथे कची कलगी तुरा । दूर कर पोकाल ह्या वथा । दाखविले स्वरूप हारपली भवभवाची चिंता । देहपंच भुती याची कशी केली रचना । आप तेज वायु पृथिवी आकाश मुळ जान । रक्त माऊस चर्म हाड रोम आली पाचगुणा । एकरूपी जडली स्तुलदेह सुते उभारना । याला तीनसे साठ हाडे । बाधीले छत्तीस हाजार नाडे । ओटकाट रोमावळी जडे । बाहात्तर कोठडे आतवेढे । दस दरवाजे दृष्टिपुढे । पंचप्राणाचा जीव सोमरुप देह वागविता । विडा पिंगळा सुशुमात्रिगुन आंगभुता । कुभकरेचे-कमाहाटही रताणे स्तीरता येतो जातो बाहेर असा स्वभाव गुणीवंता सखात शिरष्ट गुरु जगत्पती अवघ्याची माता । आधी रूप अलक्ष चराचर पंचभूत जाणीता ”

एक पिंडाची कथा सांगतो यांत दैवत जडली कैसी ग चचवडा कुर्म देव तेथे रहिवासी । घोटा आणि पोटरी मासुकी नाग त्याच तळाशी । गुडघे हाट स्वरमुळद्वारां गणेश वसतीसी । स्वाधीष्ट ब्रह्म नांदे साहिमी सहीत जाण । मणपुरीधीठाणू तेथे लक्षुमींचे रमन । आणुहात रुद्रगीरच्या पतीचे भवन । मुच्या आंगणी गणवर्व हास्तोत विंद्राचें स्नान । दास्यमयमुखी वसतीस सुदर्शन जिव्हा धाम्री सरस्वती करी सतरावींचे जीवन । नाकी आश्विनी देव, नेत्री रवी शशीचे मंडान । ल्लहाटी चंद्रकोट सूर्याचे तेज त्याच्या भवता । आगणीत चंद्राचे तेज नीच सुखाची अवस्था । शरवणी चैतनी पुणगिरी झाली स्थिरता । तेथे सतरावी प्राशिली अमरपद होवी भोगिता । तू अ ष्टांग योग सांगतो समजेल किती चतुराला । विडापिंगळा स्वाधीनकरा प्रसंगाला । एकांती बैसून स्वस्त घालते वस्त्र आसनाला । आंगोळी सादीर्ला पुनो वळकट दावी गुळघ्याला । उतरे समुख करऊनां । सूर्यचंद्र घेरे ऐचूनी । कुडलती माशी देई सोडूनी । देहकुंभ कसा हाटकरऊनी । जिव्हाग्री ध्यान देई ठेऊनी । सतरावी जिव्हेने प्रासन करूनी । उरधवचक्राचा मार्ग सोधूनी । कुंडलनीचे मुख जाईल उघडूनी । ब्रह्मगिरीच्या जाई रस्त्यानी । गुरुपद सुखभोगी आनंदानी । आखंड सुख समादी हरपे उपदेह मायाचिंता । प्रेमाचे सुटले पाझर सतरावी पेता । समदृष्टी समान विंत्रा मित्र आसता । अद्वैत नाही कोठे परात परमब्र स्वरुप पाहाता ॥ ३ ॥

ब्रह्मरुप कोंदटलें रिता ठाव कोठे नाही । सर्वांघटी भरून उरला समभाव सर्वपाई । जगतात पसरली भुली अज्ञान झाले ग ई ठाई । आहमपना मिरवीती म्हणती ही माझी हो देही । सर्वांनी प्रश्न आईकावा । मी म्हणनार पुरुष सांगावा । त्याच्या मात्यापित्याचा ठिकान लावावा । जन्मवेतल्याचा दिवस सांगावा । शास्त्र वेदात सर्व सोधावा । कवि सावळेराम म्हणे त्याची गुरुपरी नाही सत्ता । विणाकारणं सिनवी ग गर्भिणी नवमहिने जनिता । राघु कवडे ऐकून मनीं झाला चिंता झाला चिंता । प्रमाने दावीमान उनपन झाली आश्रीता ॥ ४ ॥

## लावणी

नारदाशी कथा सांगतो आईका विरंची । कथा सारामदी केले निरुपन टिका चवदायाची ॥ध्रु०॥ द्वापार यवगी रुशी जवळे होता नियूनया । त्यासी झाला पुत्र सुयश नाम तया । दशवर्शे झाला कमर वर्तबंद करजया । चांडले

रुपी होता विप्राशी काया । बारा वर्षे केली सेवा गेला स्वमीदा आनाया । कुसमीदा आणाया सुज्ञ गेला रानांते भयानक आरने लागले वृक्ष गेले गगनात । सपशाका पिंपळ पाहिला गगन चुंबीत । सपसेकावर समराक्षेस नेत्रा आरक्त । माझा कुग्धाने राक्षस धावले झाला भयभीत । ब्रह्मराक्षेसाने वेडा घातला मती हारपली त्याची । दाहि दिशा झाल्या उदास वाटा मग धरती पश्चिमची ॥२॥ पश्चीम देशाशी पळे सुयज्ञे राक्षस आले धावूनी । दक्षीन दिशाशी पळू लागला वड पाहिला नयनी । वडावरती कुसमडपशाची ऐका गुरुज्ञानी । सुयज्ञावर राक्षस धावले धावरला मुनी । सुयज्ञे जात पळूनी विशानदीशाशी । काटे साईरी पाहिली त्यांनी विस्तार गगणार्मा । डाकीत मन होले त्यावर मुकजाणसी मनगटापर मुग्य येकाचे बक्षेस तळाशी । तेव्या भयाने पळू लागला पव्छी दिशासी । कदम वृक्षावर दोन राक्षस भयंकर रूप त्याची । अग्नी दिशाशी उंबर छाया निघाली दोन पिशाची ॥२॥ आठावीस भुतमिळाली वेडाला ब्राह्मण नंदन । राक्षसासी आनंद झाला आहार पाहून । बहुकोमळ शरीर तयाचे आता भक्षू आनंदान । एकमेकासी वळा करिती भांडती कुरुधाण । आसा भुताचा गोंधळ पाहून तरमळी ब्राह्मण । तवया पासून तरले आईसा उपाय आहे कोण । मगकरी विष्णूचा धावा संकट पडले दारून । आरे कंवळा काता अनन्य शरण । अनद कंदा बाळ मुकुंदा धाव वेगीन । आकाश वाणी झाली जप करणार शिव मंत्राची । कवशी कवी वर्ष महापवित्र होईल झडती भुताची ॥ ३ ॥ आईशी झाली आली आकारास वणी सुलेक्ष्मणी मतोसक्ष । यथा विधीन स्नान केले उदक शिपु लागला । दुरबुद्धी टाकून झाले भावी विवेक आठवना । आठावीस भुताचा झाला उदार नमस्कार केला । सतमहंत तुम्ही बसले प्रसन्न आता पाही आठावीस भुताची नाव सागता कळन्द चतुराई । काय पापास्न झाले राक्षेस सागा तुम्ही वर्वी । सागितल्या विग गाण गाशील ब्रम्हहत्या पाही ब्रम्हहत्याचे कर्टीन वर्म भोगाल नर्क कवि । राघुसावळे राम कवन करितो दया नायाची । बाळा गोविंदा म्हणे हारदासा दाही ब्रिदाची । नारदाची कथा मांगतो आईका विरंची ॥ ४ ॥

## आदिनाथ प्रसन्न

आदिनाथ चरण स्मरचित्ता नसे मग भवभयाची वार्ता । दुःख दरिद्र्याची चिंता । नसे समुळ । आदीनाथ प्रणवनिज ॐकार प्रपंचाचे मुळ ॥५०॥

आदीनाथ तो ॐकार तेथूनी वेद झाले चार। मादी शाखाचा विस्तार आठरागाती। तिथून कर्म धर्म स्थापिले वाटीलया याती। सत्य नाथे सत्य स्थापीले निधानी सत्य फळासी आल प्रानी मोक्षपदासी गेले। सुटली प्रवृत्ती। सत्संगकरूनी तरले जडमुढ गती। भ्रमसंतोश नाथ ते भक्त। त्यांनी सिकविले सिस्यास वाढली कीर्ति। अचळपरी अचळगरी अचंबानाथ। अचळपदी भक्त स्थापीत होईना चळ होता कल्पांत पदअचळ। पंटरीनाथ पंढरीसी। जव आगळे तीर्थ कासी। साधु जाती दर्शनाशी। यात्रा भरती। वेणुनाद गोपाल काला तीर्थ करिती। जननाथ जगाचा धनी यात्रयेतों चवकडुनी येकच ठाई वसती भोजनी। दोषहस्ती जे करिती तयाची निंदा कष्टी होती। कैलासनाथ शिव शंकर त्याचा नकळे अंतपार। पारवती नाथ भिवशंकर। त्याचा नकळे अंतपार। पारवती नाथ उमावर पशुपती। ब्रम्हांड गोळ खेळवी सुत्रधरी हाती। वैकुंठनाथ लक्ष्मीवर। आनंद ब्रम्हांडे रोमावर मायाचा कळ तो ईश्वर। विश्वपती। अंबरनाथ वज्रानी सर्व देवाचा तो धनी। कार्य साधी उक्ती करूनी राखि दिक्पाळ॥ ३॥

दत्तनाथ दिगंबर हरिहराचा अवतार। ऐसे वदती वेद चार रक्षी भक्तासी। कामधेनु चारी वेद राहती सेवेसी। नाथत्रय आदी झाला। नाथ श्रेष्ठ आहे सर्वाला। दाही दिशा व्यापूनी वसला आजूबाजूसी। तुझे कोन आदी स्थान आहे आण सभेसी। जपी तपी सिद्ध योगी। जंगम जयी आणि वैरागी। द्रवेस कापडी अघोर लिंगी पद्य संन्यासी। हे झाले नाथापासून लोक गुणरासी। बाबाजी वस्ताद आहे रनसूर। कलगी निशान डफावर। वाबुलिंबा छंद गान्हार बसले सभेसी। शामराव बोले मानजावा आता काय गासी। कवीराज गणपती गावण। दत्तनाथ प्रसन्न पूर्ण। दिनदयाळ॥

## लावणी

(सुजनबोध)

आईका परनारीचा संग हा तिचा नाही कामाचा उपयोगास जान। खर्चून पदरचा दाम जगी भनभन॥ ध्रु०॥ खर्चून पदरचा दाम सोडूनकाम तिच्यासी रम सदोदित चोरी। नाहीं दिल चोरीचा धीट धन्य अंतरी।

इच्याशी करता भाशन, लागल दुशन, होईल शासन राजदरबारीं। नाहीं संग सुखाचा नित उरावर सुरी।

(चाल)

आपले की सारेची चितप्रान तिजवर। ती सौंदलतीचे रक्ष दहावर। कैकाला बुडवून उल्ट मारी पैजार। कैकाला बुडवून खरी। उल्ट माघारी। इने जाब मारी। तसे खोचून परनारी पाई होतीं अब्रूला हान ॥१॥ परनार परायाची। इला भोगण्याची इच्छा मनाची होऊन एकदां झाला द्रोपदीपाई दुर्योधनाचा चेंदा। पहा रावती रावनानी। सिता आणुनी। लंके नेऊनी ठेवली बंदा। आला हनुमंताचा रगडा। फिरवली गदा।

( चाल )

त्या पारवतीपाई मेला भस्मासुर झाली नारदाची नारदी तर्क हा धर। त्या विंद्राचंद्राला कलंक भंगले वीर। बहुतासी दिधला त्रास आसी नार। बहुतासी दिधला त्रास। केला इने नास जीवाला ध्यास, लाविला जान। परनारी पाई गेले कईकाचे प्राण ॥ २ ॥ द्रोपदी सती सुज्ञान, किचक अज्ञान म्हणे भोगीन इसी एक वेळ। प्रारब्ध टळेना मरण आले तत्काळ। ही ऐकून ध्यावी ग्ती। होईल माहिती। धरावा चित्ती पूर्वीचा खेळ। चतुर जाने मूर्खास कळेना क्याळ। हा विचार मनाला करून धराई सोई। पस्तावा घडता नाहीं होणार उपाई। दुःखाची आठवण रडून होणार कांहीं। गान्हाने सांगता हासतील काही भाई। आपले सजन सोईरे बोलती बरें। इनें उत्तरें घलें खोचून। ते शब्द लागती जसे जिव्हारी बाण ॥ ३ ॥ जरी असेल सेट सावकार, थोर सरदार, राजकुमार, लागल इचे पाठी। इची संगत धरता होतो...

*इच्यासी उम्या रस्त्यान कदा भाषण कदा भापण करू नये सांगू नये* गोष्टी। चतुर जाने मूर्ख नित टाळ घोटी। ( चाल )

असा परनारीचा संग आहे वाईट। साव असता धरू नये बळ लक्षण चोरट। नायदुधाईक घोंडीबासाळी मार्ग दावितो नीट। कवि काशिनाथचे कवन टिपसाळ घाट। दगडुजी हरिबा म्हणे इच्या संगतीन। नावाला कोन चढले जान घ्यावे सांगून। आब्रूला खोरी झाले कवि जाण ॥

## झगडा

जवानीच्या भरांत, जवान भरांत, साजन चयनी असावा ग । दिसण्यांत फाकडा राहीनात वाकडा नपुसक हिजडा नसावा । धान्यांत गहू होता प्रकार बहू। पन आचारी चांगला असावा । मालक हलकट, सैपाक तेलकट गोडीला फिक्कट नसावा । जमिनींत बाग वृक्षांत साग कपाशी पण असावा । येरंड पोकळ नव्हे रग येहेकळ येडा बावळ नसावा । इमारत राहाया । नामचंपाया मजबूत पाया असावा । झावळ्याचे झाकान वाऱ्याच्या जोरान भुसकून उडनार नसावा । आग, फटात रंगीरायगुन, आंगी सोंगाड्या जंगी आसावा । आडताली गानार, आवसुरी गानार, वाचाळ नाचणार नसावा । गावात चावडी खळ्यांत वावडी, आढीला ठेवा आसावा । बड्लाच फाडाव शेळ्या, मेंट्या वाढाव पायाला गाढव नसावा । प्रथम संपती, नंतर संपती, चांगल्याशी संगती आसावा । भोपाळ रयानी, मिनारा गनी बहिरा कानानी नसावा । आगसपतीसारखा, असा पाठीराखा सद्‌गुरु दगडुबाचा असावा । दत्तुदिगांवर हरिभाऊ बरोबर असावा ॥

## लावणी रंगबाजी

इंद्रवदती मिर्गनयेन रंगकेसरीचा कोठे पंचानन चुक दाधीनीचा ॥ध्रु०॥ सख्यासजनाला धाडस तरी किती हीं । बागबगीचे कांय मारी मारी ग । फुलझाडे हे फुलऊन सारी । आंबराई विकली लई । आंबराई लई विकली । नेफ्रलोक इच्छा ग । कोठ ॥ १ ॥ सख्यासजनाचे आगा जे हाती नाहीं सारीला कधीच कोनी नेती । नाही आंबरी चवरी ढाळ देती । दिसेना धनी म्हणून रानी । दिसेना धनी म्हणून रानी । झुरे जिव याचा गं । कोठे ॥ २ ॥ ठंच हे वेगेड आचार ग । महाल रंगांत काय देखावा । कसी सजनांने केली तारांबळ । रसरसला भरूनी आला भर नवतीचा ग ॥३॥ कोठें पंचाइत चुकल्या का धनी चला । सख्याची होती प्रीत फार । गेल्यापासून उतरल्या नूर । दगडोबा म्हणे धर धीर । होईल भेटी पडेल दृष्टी । होईल भेटी पडेल दृष्टी । शोक काढीचा ग कोठे पंचप्राण येन चुकल्या हारनीचा ग ॥४॥

गण

श्री नमो आधी गौरीच्या सुता, बुद्धि दे बाबा मज रे भगवंता । तुझे गुण गाया । अनाथ दीन पामर लागतो पाया ॥ १ ॥ प्रथम निराकार निर्गुण

इच्याशी करता भाशन, लागल दुशन, होईल शासन राजदरबारी । नाहीं संग सुखाचा नित उरावर सुरी ।

(चाल)

आपले की सारेची चितप्रान तिजवर । ती सौंदळतीचे लक्ष दहावर । कैकाला बुडवून उलट मारी पैजार । कैकाला बुडवून खरी । उल्ट माघारी । उने जाब मारी । तसे खोचून परनारी पाई होती अब्रूला हान ॥१॥ परनार परायाची । इला भोगण्याची इच्छा मनाची होऊन एकदा झाला द्रोपदीपाई दुर्योधनाचा चेंदा । पहा रावती राजनानी । सिता आणुनी । लंके नेऊनी ठेवली बंदा । आला हनुमंताचा रगडा । फिरवली गदा ।

( चाल )

त्या पारवतीपाई मेला भस्मासुर झाली नारदाची नारदी तर्क हा धर । त्या विंद्राचंद्राला कलंक भंगले वीर । बहुतासी दिधला त्रास आसी नार । बहुतासी दिधला त्रास । केला इने नास जीवाला ध्यास, लाविला जान । परनारी पाई गेले कईकाचे प्राण ॥ २ ॥ द्रोपदी सती सुज्ञान, किंचक अज्ञान म्हणे भोगीन इसी एक वेळ । प्रारब्ध टळेना मरण आले तत्काळ । ही ऐकून घ्यावी गती । होईल माहिती । धरावा चित्ती पूर्वीचा खेळ । चतुर जाने मूर्खास कळेना क्याळ । हा विचार मनाला करून धराई सोई । पस्तावा घडता नाहीं होणार उपाई । दुःखाची आठवण रडून होणार काहीं । गान्हाने सागता हासतील काही भाई । आपले सजन सोईरे बोलती बरें । उनें उत्तरें बळें खोचून । ते शब्द लागती जसे जिव्हारी बाण ॥ ३ ॥ जरी असेल सेट सावकार, यार सरदार, राजकुमार, लागल इचे पाठी । इची सगत धरता हाती...

हिच्यासी उभ्या रस्त्यान कदा भाषण कदा भाषण करू नये सागू नये गोष्टी । चतुर जाने मूर्ख नित लाळ घोटी । ( चाल )

असा परनारीचा सग आहे वाईट । साव असता धरू नये बळ लक्षण चोरट । नायबूधाईक धोंडीबासाळी मार्ग दावितो नीट । कवि काशिनाथचे कवन टिपसाळ याट । दगडुजी हरिबा म्हणे इच्या संगतीन । नावाला कोन चढले जान घ्यावे सागून । आब्रूला खोरी झाले कवि जाण ॥

## झगडा

जवानीच्या भरांत, जवान भरांत, साजन चपनी असावा ग । दिसण्यांत फाकडा राहीनात वाकडा नपुसक हिजडा नसावा । धान्यांत गहू होता प्रकार बहू । पन आचारी चांगला असावा । मालक हलकट, सैपाक तेलकट गोडीला फिक्कट नसावा । जमिनीत बाग वृक्षांत साग कपाशी पण असावा । येरंड पोकळ नव्हे हा पेहेकळ येडा वावळ नसावा । इमारत राहाया । नामचंपाया मजबूत पाया असावा । झावळ्याचे झाकान वाऱ्याच्या जोरान भुसकून उडनार नसावा । आग, फडात रंगीरायगुन, आंगी सोंगाड्या जंगी आसावा । आडताळी गानार, आबघुरी जानार, धेचाळ नाचणार नसावा । गावात चावडी खळ्यांत वावडी, आढीला दिव्वा आसावा । घइळाच फाडाव शेळ्या, मेंढ्या वाढाव पायाला गाढव नसावा । प्रथम संपती, नंतर संपती, चांगल्याशी संगती आसावा । भोपाळ रयानी, भिनारा प्रानी बहिरा कानानी नसावा । आगसपतीसारखा, असा पाठीराखा सद्‌गुरु गइबाबा असावा । दहुडिगांवर हरिभाऊ बरोबर असावा ॥

## लावणी रंगबाजी

इंद्रवदती मिर्गनयेन रंगकेसरीचा कोठे पंचानन चुक दाधीनीचा ॥ध्रु०॥ सपासजनाला हाडस तरी किती ही । बागबगीचे कांय भारी भारी ग । फुल-झाडे हे फुल्ऊन सारी । आंबराई पिकली लई । आंबराई लई पिकली । नोकझोक इचा ग । कोठ ॥ १ ॥ सक्यासजनाचे आगा जे हाती नाही स्वारीला कधीच कोनी नेती । नाही आंबरी चवरी ढाळ देती । दिसेना धनी म्हणून रानी । दिसेना धनी म्हणून रानी । झुरे जिव याचा गं । कोठे ॥ २ ॥ उंच हे बंगले आचार ग । महाल रंगीत काय देखाला । कसी सजनाने केली ताटातूट । रसरसला भरूनी आला भर नव्तीचा ग ॥३॥ कोठें पंचाइत चुकला का धनी चला । सक्याची होती प्रीत फार । गेल्यापासून उतरला नूर । दगडोबा म्हणे धर धीर । होईल भेटी पडेल दृष्टी । होईल भेटी पडेल दृष्टी । झोक कामीचा ग कोठे पंचप्राण येन चुकल्या हारनीचा ग ॥४॥

## गण

श्री नमो आधी गौरीच्या सुता, बुद्धि दे आता मला रे भगवंता । तुझे गुण गाया । अनाथ दीन पामर लागतो पाया ॥ १ ॥ प्रथम निराकार निर्गुण

अलक्ष भगवान, की नारायण । पुढे धुमधुमकारात होऊन गेले मंडण जी ॥२॥ जळीं स्थळी त्यांचा ठिकाणी. इंद्राप्रमाणें पात्रें आसन निद्रा करी शयनी । पुढे अष्ट गण कवी गाया झाले त्यापून जी ॥३॥ शाहीर उठती हुरपान,डाम घेऊन, करती गायण ,मंत्र याचा कोण सांग कविराया । अनाथ दीन दगडुजी लागतो पाया ॥४॥

### गण

प्रार्थितो आज या फडीधरा रंगणी येऊनी रंग भरा ॥ध्रु०॥ आंगी शेंदुराची उटी रुद्रहार घालूनी कंठी । आंकुश हाती विघ्न कापती थरथरा । प्रार्थितो आज या फडीधरा ॥१॥ सरस्वती ब्रह्मतनया कुपसनी घेऊनी माया । ब्रह्मवाणी घेऊनी करी ध्वनी झरझरा ॥२॥ प्रार्थितो दगडूमाळी गर्जे रंगणीं काशिनाथ कवी पाहूनी । वैरी जाती उठूनी पळती भरभरा । प्रार्थितो ॥३॥

### गण

धाव पाव श्रीगणराया, शरणशरण तुमच्या पाया॥ध्रु०॥ माझी अनाथाची स्तुती मान्य करा कृपामूर्ति । दीनवरती ठेवूनी प्रीती सर्व विघ्न लावी लयाला ॥ १ ॥ येवूनिया सभेप्रति यावी मसी ज्ञानमती । ऐसे गुण कीर्ति यावें रंगभूमि ठाया ॥ २ ॥ हीच मनी आहे आंस तुझे जन्मोजन्मीं तुझा मी दास । म्हणोनीच हा भवफास । टाकी टाकी तोडोनिया । साळी दगडोबाची चित्ती रामनामीं वसे प्रीती । कितीक शिकाऱ्यांची मती, लागले झुराया ॥ ४ ॥

### गण

गौरीसुता विघ्नहरा रे यावे करी त्वरा रे ॥ध्रु० ॥ श्रीगणेशा नामाची काय रे कमवू सभेमध्ये । फडें घेऊनी विघ्न वधी कृपासागरा ॥ १ ॥ मयुरारूढ सरस्वती यावे घेऊनी गणपती । द्यावी मला ज्ञानमती तुझा आसरा रे ॥२॥ नारद तुंबर रुषीमुनी तुज ध्याती रिद्धीसिद्धी । रिद्धीसिद्धीचा तू धनी कृपासागरा रे ॥ २ ॥ राखी रंग उभु गाया प्रसन्न व्हावे चित्तीचे ठाया । दगडूसाळी पडतो पाया तुझा आसरा रे ॥ ४ ॥

### गण

गवरीचा बालक, विद्येचा चालक बुद्धीचा पालक आना आना ॥ ध्रु ॥ भावे पुजुनीया रंगप्रसंगी । नववीण शक्ती ही नवरंगी । लावूनी मुद्रा बुद्धीस

मुद्रा, स्वरूपी मुद्रा आना-जाना ॥१॥ श्री गणेशा हे मूलमंत्र ॐ नमो मंत्र ॐ नमो मंत्र संभावी पात्रा मंजुळ गात्रा । वळवी माजी काना-कना । सर्वगुण तुम्हा सारखे म्हटले । गुणी हरी साळी ब्याविला पटलें । व विचा खंडा शास्त्रानें दडा । वैव्याला दंडानें हाना हाना ॥ ३ ॥

## श्रीलावणी

परपुरुष भोगिला एकांती नसें डाग मजला । अंगसंग त्या केला झाले रंग मनीं रंग भरला ॥ सासुरवास सोसीता प्रपंच्याचा आला मला त्रास । वागविलें मी फार दुःख सांगन कोनास । अहंकार सासरा छळीतो करितो धुसफुसतो । दंममा रक्षी रमावेगळ्याला अक्षी गळफास मनसा माझी नंद विचार कर रात्रंदिवस । फारधीला वैताग बिचा घरा रहिवास । ( तोड ) असदीपाडवी तमासा नाहीं तव्हमर । जे करती ते कर वीती नासले हें घर । या नंदना साग कोनाच केल नाही बर । तिची छळना मला सोसाना करकर । सुबुद्धि मग सुचली मनीं विचार केला । सोडला संसार, झाले रत परवया पुरुषाला ॥ १ ॥ येऊनीया जन्मासी वर त्या घरदार केल । आले या नरदेहाचा फार सार्थक झाला । बोधमदी रिती तीथ येकांतीं पुरुषान्रा त्याल । चौदेहाचा मंचक तेला वरती वसवीला । सुखमेजसी समता सुख वाढल, जन्ममरण चुकवील । पुरवीच पापसार त्याल । तोड । नागवेल वास नको फोडली सुपारी । आभीमानाचा चुना भाजला लावरी । वैराग्य जावी फळ भक्ती जायपत्री वरी । अनुभव वेल डोले भावार्थ का पूरभीतरी । वनवला हा विडा पुरुषाचे मुखात घातला । वागपुष्पाचा हारतुरा ग मस्तकीं खवडा ॥ २ ॥ सत्वाचा नारळ मेरुवरती धैर्याचा । पंचतत्वाची चिलीम अग्नी प्रदिप्त ज्ञानाचा । तमाखु नमाची ल्हा चीरमीत बोधाचा । पानी सत्रावीचे सोडला धूर सत्रावीचे सोडला धूर प्रपंच्याचा । विवेकाची नळी, वोटिता पेला प्रेमाचा । सुखावले अंतरी उगवला दिवस आनंदाचा । तोड । असे विलास भोगिता रात्र गेली चार प्रहरा । नानापरीचे परपुरुषाला केले उपचार । मला लागले त्याचे ध्यान करिते उपचार । त्याजवाचून मला करमतीं, निजध्यास फार । विरसले घरदार प्रपंच व्यर्थच वाटला । परपुरुष । एक खरा मिथ्या सारा खटला । काळ काया वाचा मने याचे ठावीं प्रिती जडली । सबळपुन्य माझे, म्हणूनी

संगती त्याची घडली । अहंभाव हा गेला सारा भ्रांति उडाली । नीजवस्त अवीनाश अक्षयि मजला सापडली । अचेळ अमळ अविनाश त्याची छं प्रभा पडली । ज्ञान अंजेन लेतानेत्री पाप हडनडली । तोड । पचभ्रता कोणते पुसता धरून अहभाव पचेतत्त्व हें पंचप्रान गुरुपुत्राला ठाव । पंच विषय पिंडी भवाळाला कशाशी ठाव । ऐनास पर पुरष त्याला असें अन नाव । तोचि एक परपुरष इतर माईक जाणावा । धोंडो साळी म्हणे ज्ञा काय माहित मत्राळाला मुक्ताजी करितो सिकरे दुश्चीत मनाला ।

## लावणी

नाही देवाला म्हणून मुल्लान उलटून कस बोलाव । अवळजन्मी आणू करूं याच्या जिनगीचा लिलाव । हुपत, तुरेकरा नदी गणुटोहर फार बु नादार । काय वारावरीन ह्याचा कळला आज दिदार । खातो जिवाला आपल्य बहुताचा देणेदार । गावगावी आहे तुरेकरा लहान मोठे अपदार । तुम्हाव्य गाण गाती शिकोर धन्माला म्हणे उदार । तोड । या नचान दिला नाहीं कर्य येऊन सभेमदी पुसात आधी । पुसे दुसऱ्याला म्हणतो खर चाडाळ । अर खटाळ गमवला टाळ नाही माहित स त्याला । बोल्तो चटपटा । झाली याची ह्याची घंटा । लावला बटा । सान्शशिकान्याला । पय गमावली ह्यान । नाई दिल ध्यान । बुडक्याच ध्यान पुरत वैऱ्याला । ज्याला अब्रुसी गरज त्यानें रितीनं चालावा । नकटीच कापल नाक, मोती तीन नाकात कम घागव । रडत येईना ज्याला त्यान गाण कस सागाव । हुजऱ्या देईना उत्तार करिते वाघाच वडगार । खरे दिण्याला नाहीं म्हतो कोनाच सागाव । उल्टा ह्या गोष्टी सागतो कुभाड्या या पकार मागाव । वाखाडी करावी पुरती फजेती होईल याची गावोगाव । तोड । ती गा लावण्याचा गान्हार । कवि करणार याचा म्हणणार । दिसतो लोकाला उधरेरी गातो गाणे । उगच नादान भाडली घाण । चुना नाकाला, यान कुठ मिळावल नाव । आम्हाला नाहीं ठाव । चोर का साव । अशा घटकाला उयाच फिटा नारिन । रिकामा शीन । धीग याचा जीन । काजळ ठिपका लाऊ देणाराना मागून यान नाक का उगच सोलाव । कसुटीला घासाव, सोन घासाव मग तें तोलाव ॥२॥ याडवाकड गाण म्हणाव नाहीं । उभयाताची आबरू जाती । नाहीं थोरपणा मोठेपण शब्दाची

लागती खोच मनाला । लागती वा कल्पना । दोघं एकाच परंतु घालवितो मीपणा । कोण पाहत पुखडा फुटक्या घेऊनि या दर्पना पाक होईना सुद्धा जाळीता अनुनुकत्या सर्पना । तोड हाच काय गाणार मोठा अगदीच खोटा नरवेंद्रचं गोटा । धान हें याला । वरकड कवि गाणारं ॥ लावण्या करणार । उत्तर देणार । आल्या समयाला । दोनचार लावण्या थाप । झोकतो कप । घेऊनीया डफ उठतो गायाला । गाण्याच कठीण गायाला कठीण कर्म, फोडला मर्म । धरावी कांहीं शर्म । सागतो याला । नव्हावाते होत कली मदी वाटतो नवलाव । बाजार भरला म्हणजे गाठोड उचल्यान उचलाव ॥ ३ ॥ कुल जाऊन करतात अफेली रागा नकोडता । हुकूम नामें शेवटी पदरीं सावकाराच्या पडतात । वकिलाला मिळतो पैसा । कुलमदीच बुडतात । होतो जिनगीचा लिलाव, तेव्हां सादीमदी दडाव । सावकार आणि कूळ दोघेजण, वीरश्रीनें लटतात । पऱ्हड समान येता कुळाला खोदीतात । तोड । होऊ लागला अपाई, नाहीं उपाई, खळखळा रडतो । माझी कोणी करा कीव । घेता काय जीव । आलं जणू हीच । यडयडा उडतो, तुम्ही आम्ही एकच आहो । परखे नव्हो, करितो विनंति । क्रोध फार चढतो । तुम्ही पाहणे चातूर उणे उत्तर । बोला अंतर दोघामदी पडतो । धोंडी साळी म्हणे पाहिजे जीवनाचा बोलावा । येवलेश्री तळ सारात पुढे होतो ओलावा ॥ ४ ॥

॥ श्री ॥

कुळापासून न्याय द्या, न मुळीं पिंडच अन्नाचा । अन्नापासन उत्पन्न होतो अवघ्या जनाचा ।

—:०:—